**कोरोना (कोवीड-१९) च्या अनुषंगाने बालकांच्या काळजी घेणाऱ्या संस्थांतील अत्यंत तातडीच्या अडचणी सोडविण्यासाठी बाल न्याय निधीमधून निधी उपलब्ध करुन देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## महिला व बाल विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांक- संकीर्ण-२०२०/प्र.क्र.३५/का-०३**

नविन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख- २२ एप्रिल, २०२०.

**वाचा :-**

१. आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांचे पत्र क्र.मबाविआ/कोवीड-१९/बाल-निधी/२०२०-२१/२७९, दि.२० एप्रिल, २०२०.

**प्रस्तावना :-**

महिला व बाल विकास विभागांतर्गत बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) अधिनियम, २०१५ अंतर्गत बालकांची काळजी घेणाऱ्या विविध शासकीय व स्वयंसेवी संस्था राज्यात कार्यरत आहेत. कोरोना (कोवीड-१९) विषाणूमुळे राज्यात आपत्कालीन परिस्थितीत बालकांच्या काळजीसाठी कार्यरत असणाऱ्या संस्थांना अनेक स्वयंसेवी संस्था, दानशूर व्यक्ती यांच्याकडून निधी व आवश्यक वस्तु पुरविण्यात येत आहेत. तथापि, सदर विषाणू अद्यापही आटोक्यात आलेला नसून, बालकांच्या सर्वोत्तम हिताच्या दृष्टीने संस्थेतील बालकांना सॅनिटायझर, साबण, मास्क, वैद्यकीय उपचार आणि कोरोना (कोवीड-१९) मुळे उद्भवणाऱ्या अती तातडीच्या गरजांसाठी महाराष्ट्र राज्य बाल न्याय निधीतून तातडीची बाब म्हणून प्रत्येक जिल्ह्याला आवश्यक निधी उपलब्ध करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य बाल निधी व्यवस्थापन मंडळाने घेतलेल्या निर्णयानुसार व आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांनी संदर्भाधीन पत्रान्वये प्रस्ताविल्या प्रमाणे कोरोना (कोवीड-१९) विषाणूमुळे उद्भवलेल्या आपत्कालीन परिस्थितीत बालकांच्या काळजीसाठी कार्यरत संस्थेतील बालकांच्या अत्यावश्यक गरजांसाठी राज्य बाल न्याय निधीमधून एकूण ₹ १६,७५,०००/- (अक्षरी रुपये सोळा लक्ष पंच्याहत्तर हजार फक्त) इतका निधी सदर शासन निर्णयान्वये उपलबध करुन देण्यात येत आहे.

२. सदर निधी उपलब्ध करुन देण्याबाबत खालीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी. :-

१) ज्या जिल्ह्यातील बालकांच्या काळजीसाठी कार्यरत संस्थांमध्ये ५०० पेक्षा जास्त बालके आहेत अशा जिल्ह्यांसाठी प्रत्येकी ₹ १,००,०००/-, ज्या जिल्ह्यांमधील संस्थांमध्ये १०१ ते ४९९ बालके आहेत अशा जिल्ह्यांसाठी प्रत्येकी ₹ ५०,०००/- आणि ज्या जिल्ह्यातील संस्थांमध्ये १ ते १०० बालके आहेत अशा जिल्ह्यांसाठी प्रत्येकी ₹ २५,०००/- इतका निधी उपलब्ध करावा.

२) सदर निधी कोरोना (कोवीड-१९) मळे उद्भवणाऱ्या अतितात्काळ बाबींसाठी जसे अन्नधान्य, आजारी बालकांसाठी विशेष पोषण, ॲम्बुलन्स सेवा, औषधे, अत्यावश्यक वैद्यकीय चाचण्या, सॅनिटायझर, साबन, मास्क व इतर अतितातडीच्या गरजांसाठीच वापरण्यात यावा.

३) सदर निधी खर्च करण्यासाठी जिल्हा स्तरावर जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, जिल्हा बाल संरक्षण अधिकारी व संबंधित संस्थेचे अधिक्षक अशी त्रिसदस्यीय समिती गठित करण्यात येऊन या समितीमार्फत खर्च करण्यात यावा. याबाबतच्या खर्चाच्या सर्व नोंदी स्वतंत्रपणे घेण्यात येवून त्यावर समितीच्या सर्व सदस्यांच्या स्वाक्षरी घेण्यात याव्यात.

४) कोरोना (कोवीड-१९) चा विषाणू आटोक्यात आल्यानंतर अखर्चित राहणारा निधी बाल न्याय निधीच्या खात्यात जमा करावा.

५) उपरोक्त प्रायोजनासाठी जिल्हानिहाय निधी जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांच्या बँक खात्यावर वितरीत करण्यात यावा.

६) बाल न्याय निधी व्यवस्थापन समितीचे सदस्य सचिव तथा उपायुक्त (बालविकास), महिला व बाल विकास, पुणे यांनी सदर निधीचा विनियोग उचित कारणासाठी होईल, याबाबत दक्षता घ्यावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००४२२१६०५०९५२३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAVINDRA
SITARAM JARANDE

Digitally signed by RAVINDRA SITARAM JARANDE
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=186d0f0fdd27c79b9b3f859a90ec537946c37d5876e64ce525d082
e58e494c85, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBA,
serialNumber=4d2dc3dbd5c0f35a66a84c93b4cead367c64cc2bc9d7391e9
a053988a2f81b64, ou=WOMEN AND CHILD DEVLOPMENT,
o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=RAVINDRA SITARAM JARANDE
Date: 2020.04.22 16:07:54 +05'30'

( र. सि. जरांडे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष/ सदस्य, विधानसभा/ विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/ विधानपरिषद, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. मा.मंत्री/ राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांची खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे
९. उप आयुक्त (बाल विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे
१०. उप आयुक्त (महिला विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे
११. सर्व विभागीय उपायुक्त (महिला व बाल विकास)
१२. सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी
१३. सर्व जिल्हा कार्यक्रम अधिकारी (महिला व बाल विकास), जिल्हा परिषद
१४. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
१५. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर
१६. सर्व उपसचिव, सर्व अवर सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-६/ अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई

१८. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सदर निधी बी.डी.एस. प्रणालीवर वितरीत करण्याच्या विनंतीसह अग्रेषित.

१९. अवर सचिव/ कक्ष अधिकारी (कार्यासन-२, ३, ७-अ, ८, ९ ,१०), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

२०. निवड नस्ती, का-३.